**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ साठी शबरी आदिवासी घरकुल योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**(मुख्य लेखाशीर्ष - २२२५ डी २७१)**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/का-६.**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक: - ३० मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१,दि.३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.२/कार्यासन-६, दि.८.७.२०२१ व दि.१६.१२.२०२१ व दि.११.०३.२०२२.

३) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र.शबरी-२०२०/प्र.क्र.१२३/कार्या-१७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शबरी आदिवासी घरकुल योजनेतून अनुसूचित जमातीच्या पात्र लाभार्थ्यांना पक्के घरकुल बांधण्यासाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येते. या योजनेंतर्गत दरवर्षी उद्दिष्ट निश्चित करण्यात येऊन त्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. त्या अनुषंगाने यापुर्वी सन २०२१-२२ आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एकूण रू.२१०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता सन २०२१-२२ करीता देण्यात आजलेल्या घरकूलांचे उद्दिष्ट पुर्ण करण्याकरीता संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावावर वित्त विभागाच्या मान्यतेस अनुसरुन सुधारीत अंदाजाच्या मर्यादेतील उर्वरीत निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २२२५ - अनुसूचित जाती व जमाती यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली शबरी आदिवासी घरकुल योजनेकरीता सन २०२१-२२ या वर्षातील तरतुदींतून वित्त विभागाच्या मान्यतेने सुधारीत अंदाज मंजूर तरतूदीपैकी उर्वरीत रू.५२५०.०० लाखइतका निधी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव व लेखाशीर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सुधारीत अंदाज सन २०२१-२२ | यापुर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| शबरी आदिवासी घरकुल योजना (२२२५ डी २७१) | ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३५०००.०० | २६२५०.०० | २१०००.०० | ५२५०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु. ५२५०.०० लाख (अक्षरी रुपये बावन्न कोटी पन्नास लाख फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. त्यांनी सदर योजनेचे अंमलबजावणी अधिकारी म्हणून संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी तथा उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष (ग्रामीण गृहनिर्माण) यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) प्रणालीवर तात्काळ वितरीत करावा.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय कार्यालयाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३६७/व्यय-१४, दि.२८.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२९१३३७५१४३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0ed f3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F 20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.30 14:09:03 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य, सीबीडी-बेलापूर, नवी मुंबई.
६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.